**पोलीस कोठडीतील/कारागृह कोठडीतील अनैसर्गिक मृत व्यक्तीचे शवविच्छेदनासाठी आदर्श शवविच्छेदन अहवालाचा फॉर्म तसेच, शवविच्छेदन करताना घेण्यात येणा-या व्हिडीओ फिल्म <u>काढण्यासंदर्भातील मार्गदर्शक सुचना.</u>**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक- एसएचआरसी-२०१८/प्र.क्र. ९१/पोल-१४**

मुख्य इमारत, दुसरा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०२ ऑगस्ट, २०१८

<u>वाचा-</u> १. शासन परिपत्रक, गृह विभाग क्र. एचआरसी-०५९७/६५/पोल-१४, दिनांक २२.०२.२००१

२. शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र.एचआरसी- ०९९५/३४/पोल- १४, दिनांक १८.०१.१९९९.

३. शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एचआरसी-०५९७/६५/पोल- १४, दिनांक १०.०९.१९९९.

४. राज्य मानवी हक्क आयोगाचे दिनांक ०८.०६.१९९९ चे पत्र.

५. राज्य मानवी हक्क आयोगाचे पत्र क्र. एसएचआरसी-सीडी १३३/२००३, दिनांक ११.०८.२००५.

६.अवर सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे पत्र क्र वैशिव-२०१८/प्रक्र०७/प्रशा२ दि.१०.४.२०१८

७.संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/शिकाना/पोलीस कोठडीमृत्यु/शवविच्छेदन/४८/२०१८, दिनांक ९.७.२०१८.

८.उपसचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग यांचे पत्र क्र. वैशिवि-२०१८/८९५/प्रक्र ३२०/प्रशा-२, दिनांक ३१.७.२०१८ रोजीचे पत्र.

<u>प्रस्तावना-</u>

संदर्भाधीन दिनांक १८.०१.१९९९ च्या शासन परिपत्रकान्वये, पोलीस कोठडीत/कारागृहात तसेच, पोलीसांच्या ताब्यात असताना मृत पावणा-या व्यक्तीचे शवविच्छेदन करताना व्हिडीओ फिल्म घेण्याची जबाबदारी मुंबई शहरात अपमृत्युनिर्णेता व जिल्हा/तालुका पातळीवर सिव्हिल सर्जन यांची राहिल, असे नमुद करण्यात आले होते.

त्यानंतर, संदर्भिय दिनांक १०.०९.१९९९ च्या परिपत्रकान्वये, बृहन्मुंबई येथील जबाबदारी शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीआरए-०१९८/३४१४/४७/पोल-१४, दिनांक ०९.०७.१९९९ अन्वये, विहित करण्यात आलेल्या आठ शवविच्छेदन केंद्र/रुग्णालयाच्या अधिष्ठाता यांची राहील, असे नमूद करण्यात आले आहे. यावर निरनिराळया क्षेत्रीय प्राधिका-याकडून आलेल्या सुचना लक्षात घेऊन शासनाने दिनांक २२.०२.२००१ च्या परिपकान्वये "पोलीस कोठडी/कारागृह तसेच, पोलीसांच्या ताब्यात असताना मृत पावणा-या सर्व व्यक्तींच्या मृतदेहाचे शवविच्छेदन ज्या ठिकाणी न्याय वैद्यक शास्त्र विभाग कार्यरत आहे, अशा शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाशी संलग्न असणा-या शैक्षणिक रुग्णालयात करण्याची जी पध्दत राज्यात सर्व ठिकाणी अवलंबली जाते, तीच पध्दत बृहन्मुंबईत अवलंबण्यात यावी, म्हणजेच, असे

शवविच्छेदन बृहन्मुंबईत ग्रॅन्ट वैद्यकीय महाविद्यालयात करण्यात यावे."अशी सुधारणा करण्यात आली. त्याअनुषंगाने पोलीस कोठडीत/कारागृहात तसेच, पोलीसांच्या ताब्यात असताना मृत्यु पावणा-या सर्व व्यक्तींच्या मृतदेहाचे शवविच्छेदन करण्यासाठी ज्या ठिकाणी न्याय वैद्यक शास्त्र विभाग कार्यरत आहे, अशा राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाची यादी तसेच संलग्न शैक्षणिक रुग्णालयासह मृत व्यक्तीचे शवविच्छेदन व व्हिडीओ चित्रीकरण करणे याबाबतची सविस्तर कार्यपध्दती शासन परिपत्रक, दिनांक २२.०२.२००१ अन्वये निश्चित करण्यात आली आहे.

गृह विभाग परिपत्रक दिनांक २२.२.२००१ निर्गमित झाल्यानंतर राज्यात अकोला, कोल्हापूर, लातूर, चंद्रपूर, गोंदिया व जळगाव या जिल्हयांमध्ये शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांची स्थापना झालेली आहे. त्यामुळे सदर महाविद्यालयांची नावे गृह विभागाच्या उक्त परिपत्रकाच्या यादीत अंतर्भूत नाहीत. अकोला, कोल्हापूर, लातूर, चंद्रपूर, गोंदिया व जळगांव या जिल्हयातील पोलीस कोठडीतील/कारागृहातील मृत व्यक्तींचे शवविच्छेदन करण्यासाठी लगतच्या जिल्हयातील शासकीय रुग्णालयात घेवून जावे लागते. सदरचे अंतर जास्त असल्यामुळे मृत व्यक्तीच्या नातेवाईकांना शारिरिक, मानसिक त्रास तसेच आर्थिक भुर्दंड देखिल सहन करावा लागतो. याव्यतिरिक्त पोलीस व प्रशासनाला सुध्दा याचा अतिरीक्त ताण सहन करावा लागतो. मा. राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या निर्देशानुसार अशा मृत व्यक्तीचे शवपरिक्षण फक्त सुर्योदय ते सुर्यास्तापर्यंतच करता येते. सदर परिस्थिती पाहता लगतच्या जिल्हयाचे अंतर जास्त असल्यास सुर्यास्तापूर्वी लगतच्या जिल्हयातील शासकीय महाविद्यालयात सदर मृत व्यक्तीचे शवपरिक्षण करणे अडचणीचे होते. तसेच सदर प्रक्रीया करुन शवविच्छेदन करण्यास जास्त वेळ होत असल्यामुळे मृत व्यक्तीच्या नातेवाईकांकडून गोंधळ घालण्यात येऊन कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होतो. तसेच काही वेळा मृतदेह देखिल खराब होण्याची शक्यता असते.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने संदर्भिय पत्र क्र.८ अन्वये, अशा मृत व्यक्तींचे शवविच्छेदन करणा-या शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांच्या यादीमध्ये राज्यातील अकोला, कोल्हापूर, लातूर, चंद्रपूर, गोंदिया व जळगांव येथील शासकीय महाविद्यालयांचा समावेश करण्याबाबत गृह विभागास विनंती केली आहे. त्यानुसार पोलीस कोठडी/कारागृह/पोलीसांच्या ताब्यात असतांना मृत्यू पावणा-या व्यक्तींचे शवविच्छेदन करण्यासाठी ज्या ठिकाणी न्यायवैद्यक शास्त्र विभाग कार्यरत आहे अशी शासकीय वैद्यकीय महाविद्यालये, त्यांचेशी संलग्न रुग्णालये तसेच त्यांचे कार्यक्षेत्र नव्याने घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक: -**

पोलीस कोठडी/कारागृह/पोलीसांच्या ताब्यात असतांना मृत्यू पावणा-या व्यक्तींचे शवविच्छेदन सोबत जोडलेल्या विवरणपत्र-अ मधील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयामध्ये (त्यांचे कार्यक्षेत्रानुसार) करण्यात यावे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील संलग्नित शैक्षणिक रुग्णालये कि जेथे न्यायवैद्यकशास्त्र विभाग कार्यरत आहे, तेथे कोठडीत/ताब्यात असताना मृत्यु पावणा-या व्यक्तीचे शवविच्छेदन व व्हिडीओ चित्रिकरण करणे व ते सीलबंद करुन ते त्वरीत राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाला पाठविणे ही जबाबदारी त्या -त्या शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील न्यायवैद्यक पॅथॉलोजिस्ट

(Forensic Pathologist) यांची राहिल. शवविच्छेदन हे न्यायवैद्यक पॅथॉलोजीस्ट यांनी दोन किंवा अधिक डॉक्टरांच्या पॅनेलसह करावे. व्हिडीओ ग्राफर हा फॉरेन्सीक पॅथॉलोजीस्टला इन्क्वेस्ट करणा-या प्राधिका-याने उपलब्ध करुन द्यावा व तो व्हिडीओग्राफर त्यांनी जिल्हादंडाधिका-याच्या अधिकृत पॅनेलमधुन घ्यावा. व्हिडीओ चित्रीकरणावर येणारा खर्च हा प्रथम संबंधीत शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाचे अधिष्ठाता यांनी करावा व तो नंतर संबंधित पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक/कारागृह विभाग यांचेकडुन वसूल करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०८०३११२४३०१०२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

Jaysing L.Pawara

Digitally signed by Jaysing L.Pawara
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f11b49d608f53d77adcefe8115025d93bfe9dbee3f61b1c150d64818cb09f90c, cn=Jaysing L.Pawara
Date: 2018.08.03 11:26:19 +05'30'

(ज.ल.पावरा)
सह सचिव, गृह विभाग

**प्रत-**

१. सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. कारागृह महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. पोलीस महानिरिक्षक (मानवी हक्क संरक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
८. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
९. अधिष्ठाता, ग्रॅन्ट मेडीकल कॉलेज, मुंबई
१०. डीन, जे.जे. रुग्णालय, मुंबई
११. पोलीस सर्जन, मुंबई
१२. सर्व पोलीस आयुक्त
१३. सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरिक्षक
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. सर्व पोलीस अधीक्षक
१६. अधिष्ठाता, जे.जे. रुग्णालय, पोस्टमोर्टेम सेंटर, भायखळा, मुंबई
१७. अधिष्ठाता, राजावाडी रुग्णालय, पोस्टमोर्टेम सेंटर, मुंबई
१८. अधिष्ठाता, कुपर रुग्णालय, पोस्टमोर्टेम सेंटर, जुहू, मुंबई
१९. अधिष्ठाता, सेंट जॉर्ज रुग्णालय पोस्टमोर्टेम सेंटर, मुंबई
२०. अधिष्ठाता, जी.टी. रुग्णालय, मरीन लाईन ,मुंबई

२१. अधिष्ठाता, के इएम रुग्णालय पोस्टमोर्टेम सेंटर, मुंबई
२२. अधिष्ठाता, लोकमान्य टिळक रुग्णालय पोस्टमोर्टेम सेंटर, सायन, मुंबई
२३. अधिष्ठाता, टी. एन. नायर रुग्णालय पोस्टमोर्टेम सेंटर, मुंबई सेंट्रल, मुंबई
२४. अधिष्ठाता, ग्रॅन्ट वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई
२५. अधिष्ठाता, बी.जे. वैद्यकीय महाविद्यालय, पुणे
२६. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज
२७. अधिष्ठाता, डॉ. वैशंपायन स्मृती वैद्यकीय महाविद्यालय, सोलापूर.
२८. अधिष्ठाता, कै. भाऊसाहेब हिरे शासकीय वैदयकीय महाविद्यालय, धुळे.
२९. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, औरंगाबाद
३०. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड
३१. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर
३२. अधिष्ठाता, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर
३३. अधिष्ठाता, स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण वैद्यकीय महाविद्यालय, अंबेजोगाई
३४. अधिष्ठाता, के. वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ
३५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातुर,
३६. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदुरबार
३७. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जळगाव
३८. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, चंद्रपूर
३९. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया
४०. राजा छत्रपती शाहु महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, कोल्हापूर
४१. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला.

शासन परिपत्रक क्रमांक- एसएचआरसी-२०१८/प्रक्र ९१/पोल-१४, दिनांक ०२ ऑगस्ट, २०१८ चे

विवरणपत्र-अ

शासकीय महाविद्यालय व त्याचेकडुन शवविच्छेदन व शवविच्छेदन व्हिडीओ चित्रिकरण सेवा घेणारी कारागृहे, जिल्हयातील सर्व पोलीस ठाणी याबाबतचा सविस्तर तपशिल

| अ. क्र. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय न्याय वैद्यक शास्त्र विभाग | संबंधित सेवा घेणारे जिल्हे व त्या जिल्हयाअंतर्गत येणारे सर्व पोलीस ठाणे व त्या जिल्हयाअंतर्गत येणारी सर्व कारागृहे |
|---|---|---|
| १. | ग्रॅन्ट वैद्यकीय महाविद्यालय, जे.जे. रुग्णालय समुह,मुंबई | बृहन्मुंबई, नवी मुंबई, ठाणे, रायगड, पालघर |
| २. | बी.जे. वैद्यकीय महाविद्यालय व ससून रुग्णालय, पुणे | पुणे, अहमदनगर |
| ३. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज | सांगली, सातारा |
| ४. | राजा छत्रपती शाहु महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, कोल्हापुर | कोल्हापूर, रत्नागिरी, सिंधूदूर्ग |
| ५. | डॉ. वैशंपायन स्मृती शासकिय वैद्यकीय महाविद्यालय, सोलापूर | सोलापूर |
| ६. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर | लातुर, उस्मानाबाद |
| ७. | स्वामी रामानंदतीर्थ ग्रामीण शासकिय वैद्यकीय महाविद्यालय,अंबेजोगाई | बीड |
| ८. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, औरंगाबाद | औरंगाबाद, जालना, |
| ९. | डॉ.शं.च.शासकीय वैद्यकीय महाविद्यालय , नांदेड | नांदेड, परभणी, हिंगोली |
| १०. | कै. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे | नाशिक, धुळे, नंदुरबार |
| ११. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,जळगाव | जळगाव |
| १२. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,अकोला | अकोला, अमरावती, बुलढाणा |

| | | |
|---|---|---|
| १३. | कै.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,यवतमाळ | यवतमाळ, वाशिम |
| १४. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,चंद्रपूर | चंद्रपूर, गडचिरोली |
| १५. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,गोंदिया | गोंदिया |
| १६. | इंदिरा गांधी शासकिय वैद्यकीय महाविद्यालय,नागपूर | भंडारा, वर्धा |
| १७. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,नागपूर | नागपूर |